राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत केंद्र व राज्य हिश्याकरीता नवीन लेखाशीर्षास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : रानयो-२०२४/प्र.क्र.८२/आस्थापना-अ**
नविन प्रशासन भवन, १५वा मजला,
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२५.

**प्रस्तावना:**

राष्ट्रीय नदी संवर्धन संचालनालयाच्या (NRCD) दि.१४.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय नदी संवर्धन योजना या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंधाच्या रुपये १९२६.९९ कोटीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. सदर प्रकल्प किंमतीत Project Management Cunsltancy services साठी लागणारा रुपये ७८.५६ कोटी इतक्या रकमेचा समावेश असून सदर रक्कम केंद्र शासनाद्वारे वितरित करण्यात येईल. तसेच Centages साठी लागणारे रुपये १२०.६६ कोटी इतकी रक्कम महाराष्ट्र शासन व नागपूर महानगरपालिका यांनी संयुक्तपणे अदा करावयाची आहे व प्रकल्पाच्या उर्वरित कामांसाठीच्या खर्चामध्ये केंद्र शासन, राज्य शासन व नागपूर महानगरपालिकेचा हिस्सा अनुक्रमे ६०%: २५%: १५% असणार असून तो प्रत्येकी अनुक्रमे रु. १११५.२२ कोटी, रु. ५०७.३६ कोटी व रुपये ३०४.४१ कोटी इतका येत असल्याचे नमूद केले आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिश्याचा निधी अर्थसंकल्पित करून वितरित करण्यासाठी महालेखापाल, मुंबई यांच्या मान्यतेने तसेच नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने नवीन लेखाशीर्षास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प)** या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणी पुढील लेखाशीर्षास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मागणी क्र. | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|---|
| | Demand No. | यु-४ | U-4 |
| १. | प्रधान शीर्ष/ Major Head | ३४३५- परिस्थितीकी व पर्यावरण | 3435-Ecology and Environment |

| | | | |
|---|---|---|---|
| | प्रधान शीर्ष/Sub Major Head | ०४- प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण | 04- Prevention and Control of Pollution |
| | गौण शीर्ष/ Minor Head | १०३- वायू व जलप्रदूषण प्रतिबंध, | 103- Prevention of Air and Water Pollution |
| | गट शीर्ष/ Group Head | (०३)- राष्ट्रीय नदी संवर्धन योजन | (03)- National River Conservation Plan |
| | उप गट शीर्ष/ Sub Group Head | (०३)(०२)- नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प (केंद्र हिस्सा ६०%)(जायका कर्ज) (कार्यक्रम) | (03)(02)-Project for Pollution abatement of Nag River in Nagpur (Central Share 60%) (JICA Loan) (Scheme) |
| | | ३१- सहायक अनुदान(वेतनेतर) | 31-Grant in Aid (Non salary) |
| | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी सहायक अनुदान. | 35-Grant in Aid for creation of Capital Assets. |
| | | लेखाशीर्ष-३४३५१३९२ | CRC-34351392 |
| २. | प्रधान शीर्ष/ Major Head | ३४३५- परिस्थितीकी व पर्यावरण | 3435-Ecology and Environment |
| | प्रधान शीर्ष/Sub Major Head | ०४- प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण | 04- Prevention and Control of Pollution |
| | गौण शीर्ष/ Minor Head | १०३- वायू व जलप्रदूषण प्रतिबंध, | 103- Prevention of Air and Water Pollution |
| | गट शीर्ष/ Group Head | (०३)- राष्ट्रीय नदी संवर्धन योजना | (03)- National River Conservation Plan |
| | उप गट शीर्ष/ Sub Group Head | (०३)(०३)- नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प (राज्य हिस्सा २५%) (जायका कर्ज) (कार्यक्रम) | (03)(03)-Project for Pollution abatement of Nag River in Nagpur (State Share 25%) (JICA Loan) (Scheme) |
| | | ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) | 31-Grant in Aid (Non salary) |
| | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी सहायक अनुदाने. | 35-Grant in Aid for creation of Capital Assets. |
| | | लेखाशीर्ष-३४३५१४०९ | CRC-34351409 |

२. सदर शासन निर्णय महालेखापाल, महाराष्ट्र-०१, मुंबई यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.सं.ख.वि/चा-१ पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग/ युओआर-३०४/२०२४-२५/२२४६, दिनांक १०.०२.२०२५, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७६/ का.१४७२, दि.११.०२.२०२५ व वित्त विभागाच्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०४१५५४२५७००४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADANE VISHAL VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2025.03.04 15:56:07 +05'30'

**( वि.वि.मदने),**
**अवर सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल),**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
११. अधिदान व लेखाधिकारी, वाद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३.सचालक, लेखा व कोषागरे, मुबई
१४.वित्त विभाग (व्यय-१६)
१५.नियोजन विभाग (कार्यासन-१४७२)
१६. निवड नस्ती.